फकीरजवळा व ९ गावे ता. धारुर जिल्हा बीड या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय क्र.पापुयो-२००८/प्र.क्र.११५/पापु १८
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०८ /०३ /२०१०

संदर्भ:- १) शा.नि..पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ववेका-१०९८/सीआर-४४५/(अ)/ पापु-१०,दि.१/६/१९९८
२) शासनपत्र, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ग्रापापु-११०६/प्र.क्र.८७/ पापु-०६, दि.२१/३/२००७.

**प्रस्तावना** :-

फकीरजवळा व ९ गावे ता. धारुर जिल्हा बीड या पाणी पुरवठा योजनेच्या रु.४५०.०० लक्ष रकमेच्या ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास वर नमूद केलेल्या दि.१/६/१९९८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापी, काही अपरिहार्य कारणामुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली. सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याच्या हेतूने स्थापन करण्यात आलेल्या वित्त विभाग, नियोजन विभाग व या विभागातील आणि क्षेत्रिय स्तरावरील महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिकाऱ्यांच्या छोटया गटाने दि. १४ व १५.२.२००७ रोजीच्या बैठकीत सदर योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची शिफारस केली आहे. सदर बैठकीचे इतिवृत्त वर नमूद केलेल्या दि.२१/३/२००७ च्या शासन पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. त्या अनुषंगाने कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, ता.अंबाजोगाई जि.बीड यांच्याकडून प्राप्त झालेल्या फकीरजवळा व ९ गावे ता. धारुर जिल्हा बीड पाणी पुरवठा योजनेला सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :-

उपरोक्त प्रस्तावनेच्या अनुषंगाने फकीरजवळा व ९ गावे ता. धारुर जिल्हा बीड या पाणी पुरवठा योजनेच्या रु.७९६.६६ लक्ष (रुपये सात कोटी शहाण्णव लक्ष सहासष्ट हजार फक्त) किंमतीच्या सुधारीत अंदाजपत्रकास व आराखडयास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून वर्धित वेग व किमान गरजा कार्यक्रमांतर्गत करावयाच्या तरतुदीचा तपशील या शासन निर्णयासोबतच्या सहपत्रात दर्शविण्यात आला आहे.

२. ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

३. या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरीच्या शासन निर्णयात ज्या सूचना दिलेल्या आहेत, त्यांचे काटेकोरपणे पालन करावे, तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत, त्यांचेही पालन करण्यात यावे.

४. सदर योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित जिल्हा परिषद जिल्हा परिषदेच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, अंबाजोगाई यांच्याकडून योजना प्रत्यक्षांत पूर्ण झाली आहे या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद/ग्रामपंचायतीच्या अधिकाऱ्यांनी संयुक्तपणे पहाणी करुन अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

५. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यावर दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्रीचे नवीकरण निधीसाठी किंवा योजनेच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर फी नियम १९६० मधील तरतुदीनुसार आकारता येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल हे बघण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची/जिल्हा परिषदेची राहील. त्यानुसार या योजनेसाठी पाणीपट्टीचा दर आकारण्यात यावा. वरीलप्रमाणे दर आकारणी करुनही योजना आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण झाली नाही तर देखभाल दुरुस्तीचा जादा खर्च ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस त्यांच्या इतर उत्पन्नातून भागवावा लागेल.

६. या योजनेवर होणारा खर्च (मागणी क्र. वाय-२), २२१५ - पाणी पुरवठा व स्वच्छता-०१-पाणी पुरवठा-१०२-ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम-जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने-(०२)(०१) (डब्लुएस-६) (राज्य क्षेत्र) या पाणी पुरवठा योजनांसाठी ग्रामपंचायती/जिल्हा परिषद यांना अनुदाने (२२१५ १२१७) ४१ सहायक अनुदाने या लेखा शिर्षाखाली खर्च घालून त्या शिर्षाखाली केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

७. हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या व वित्त विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १५/१०/व्यय-३, दि.२२/०२/२०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०१००३०८१५४०२८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sd/-

*(ब.धों.चिंचकर)*

*कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन,*

प्रत,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, नरिमन पॉईंट, मुंबई २१
२. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद .
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड .
४. सदस्य सचिव (छोटा गट) तथा अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, औरंगाबाद .
५. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, लातूर.
६. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा , महाराष्ट्र शासन, पी.एम.टी.बिल्डींग, स्वारगेट, पुणे-४११ ०३७.
७. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, औरंगाबाद .
८. वरीष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, बीड .
९. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, अंबाजोगाई, जि.बीड .
१०.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, बीड .
११. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
१२. महालेखापाल, (लेखा व परिक्षण) महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
१३. *कक्ष अधिकारी* , वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई.
१४. *कक्ष अधिकारी* ,नियोजन विभाग, (का.क्र.१४७३) मंत्रालय, मुंबई.
१५.मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
१६.मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
१७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
१८. मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
१९. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-३२, कार्यासन क्र. पापु-०४, ०७, १०, संगणक कक्ष.
२०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ, सचिवालय, ग्रंथालय, विधानभवन, ६वा मजला, मुंबई / नागपूर.
२१. निवड नस्ती (पापु-१८ )

$$$$$$$

## सहपत्र

शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. पापुयो- २००८/प्र.क्र.११५/पापु-१८
दिनांक :- ०८/ ०३/२०१० चे सहपत्र.

( रु.लाखात )

| योजनेचे नांव | योजनेची मूळ मंजूर किंमत | | | योजनेची सुधारीत किंमत | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत मंजूर तरतूद | किमान गरजा कार्यक्रमा-अंतर्गत मंजूर तरतूद | एकूण | वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत सुधारीत तरतूद | किमान गरजा कार्यक्रमांतर्गत सुधारीत तरतूद | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| फकीरजवळा व ९ गांवे तालुका धारुर जिल्हा बीड प्रादेशिक पाणी पुरवठा योजना. | ३८१.०० | ६९.०० | ४५०.०० | ३८१.०० | ४१५.६६ | ७९६.६६ |

Sd/-
*( ब.धों. चिंचकर )*
*कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन.*